# एक आद्य प्रबोधनकार

वसंत पळशीकर

इंग्रजी राजवटीच्या संपर्काने, आघाताने बंगालमध्ये घडून आलेले प्रबोधन आपणा सर्वांच्या किमान ऐकून तरी परिचयाचे आहे. पण, बंगालमध्ये इंग्रजांची सत्ता प्रस्थापित होण्यापूर्वीपासूनच मुंबई बेटावर ती स्थिर झाली होती हे लक्षात घेता, प्रबोधनाची घटना मुंबईतही सामान्यतः त्याच सुमारास घडून आली असली पाहिजे. पण सांस्कृतिकदृष्ट्या आपल्या बहुतेकांच्या मनात मुंबईचे अस्तित्व महाराष्ट्रापासून वेगळेच राहिले आहे. आजही, खास मराठी म्हणता येतील अशा सांस्कृतिक घटना सोडता मुंबईच्या बृहत्तर सांस्कृतिक जीवनाशी मराठी माणूस, आणि सर्वसामान्य माणूस नव्हे तर चांगला तुमच्याआमच्यासारखा सुशिक्षित माणूसदेखील समरस झालेला नाही. ती मुंबई त्याला परकी राहिलेली आहे. याचेच एक गमक असे की, एकोणिसाव्या शतकात मुंबईत जे प्रबोधन घडून आले त्याची महाराष्ट्राने अद्यापही विशेष दखल घेतलेली नाही; हीही गोष्ट खरीच की, त्या प्रबोधनाचा महाराष्ट्रीय जीवनावरील प्रभाव नगण्यच राहिला. याचे आणखी एक स्पष्टीकरण देता येण्यासारखे आहे. महाराष्ट्रीय समाजात सांस्कृतिकदृष्ट्या ब्राह्मणांचे वर्चस्व होते तर मुंबईचे प्रबोधन हे प्रामुख्याने, किंबहुना सर्वस्वी, ब्राह्मणेतर जातीयांचे आणि पुष्कळशा प्रमाणात अन्यधर्मीयांचे कर्तृत्व होते. आपल्या जात्यंध व कप्पेबंद समाजजीवनाचे संस्कार किती खोलवर गेले आहेत त्याचे एक प्रत्यंतर असे की ब्राह्मणेतर व्यक्तींनी केलेले प्रबोधनकार्य ब्राह्मणी समाजाला उपरेच वाटत आले आहे. हीच गोष्ट इतर जातीयांची. मराठ्यांना छत्रपती शाहू महाराजांपासूनच, अलीकडे फार तर ज्योतिबांपासून, प्रबोधनास सुरुवात झाली असे वाटते तर महार-नवबौद्धांना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अलीकडे-पलीकडे कोणीच दिसत नाही. हे सारेच सामाजिक वास्तव भयावह आहे. मोठे दुर्दैवी आहे. श्री. अ.का. प्रियोळकर यांचे 'डॉ. भाऊ दाजी : व्यक्ती, काल व कर्तृत्व' हे पुस्तक वाचल्यावर आपले दुर्दैव किती मोठे त्याची कल्पना येते. त्यांच्यानंतरच्या काळात महाराष्ट्रात कर्तृत्ववान माणसे निर्माण झाली नाहीत असे नाही. पण ज्यांनी महाराष्ट्राचे मानस घडविले ती बहुतेक सर्व माणसे डॉ. भाऊ दाजी यांच्या तुलनेने निरुंद दृष्टीची आणि जातपातीने बद्ध जीवनाच्या चाकोरीतली होती असे म्हणता येते. मुंबईचे हे अव्वल प्रबोधनकार बहुढंगी होते, आदर्श अर्थाने बहुढंगी होते. त्यांची दृष्टी सर्वसमावेशक, वृत्ती उदार होती. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत त्यांना रस होता, आणि सर्वच जीवनाची उंची व संपन्नता वाढविण्याचा, एकाच वेळी वाढविण्याचा त्यांचा प्रयत्न होता. आधी राजकीय की आधी सामाजिक असले मूर्ख वाद त्यांच्या मनात उपस्थितच होऊ शकत नव्हते. आपले दुर्दैव असे की, बृहत्तर महाराष्ट्राच्या जीवनाशी जोडणारे पूल त्या काळी नव्हते, या प्रबोधनकारांनाही ते बांधता आले नाहीत; व प्रबोधनाची ही गंगा मुंबई बेटातच अडकून पडली. व पुढे लुप्त झाली.

डॉ. भाऊ दाजींचे व्यक्तिमत्व व कर्तृत्व दैदिप्यमान असले पाहिजे. सापेक्षतः अल्पवयात त्यांच्याकडे मुंबईच्या सार्वजनिक जीवनाचे पुढारीपण चालत आले. आणि ते त्यांच्या हाती त्यांच्या मृत्यूपर्यंत टिकून होते. व्यवसायाने ते डॉक्टर होते. वैद्यकीय संशोधन, पुराणेतिहास संशोधन, शिक्षण प्रसार, राजकीय हक्कांसाठी चळवळ, मराठी नाट्यकलेचे पुनरुज्जीवन, अशा अनेक क्षेत्रांत त्यांनी मौलिक कामगिरी बजावली. तीही अवघ्या वीस वर्षांच्या प्रौढ आयुष्यात. हा माणूस अफाट कर्तृत्वाचा असला पाहिजे.

श्री. प्रियोळकरांनी चरित्राचे लेखन अतिशय नेटके केले आहे. त्यासाठी त्यांनी जे परिश्रम घेतले आहेत ते आजच्या पिढीतल्या बहुतेकांना लाजविणारे आहेत. त्यांच्या भूमिकेतल्या दोनचार लहान गोष्टी खटकतात. उदा. भाऊ दाजी प्राइझमेन यांची यादीच त्यांनी ग्रंथात दिलीय; तसेच भाऊ दाजी निधीच्या देणगीदारांची संपूर्ण यादी छापलीय. या दोन्हींचे प्रयोजन नव्हते.

तसेच उतारे उद्धृत करताना मूळ भाषा कायम ठेवणे काही प्रसंगी आवश्यक व इष्ट असले तरी कित्येक अनावश्यक जागीही मूळ इंग्रजी कायम ठेवलेले आहे. अशा कित्येक ठिकाणी मराठी भाषांतर दिल्याने अस्सलपणात फरक पडला नसता. आधुनिक

महाराष्ट्राच्या घडणीचा सम्यक इतिहास लिहिण्याचे काम कोण केव्हा करेल ते करो; अशा इतिहासाचे लेखन ज्या साधनांखेरीज करणे अशक्य जाईल अशा स्वरूपाचा एक साधन-ग्रंथ उपलब्ध करून दिल्याबद्दल मराठी माणूस श्री. प्रियोळकरांचा ऋणी राहील आणि अशी प्रार्थना करील की त्यांना हे महत्त्वाचे कार्य अनेक वर्षे करीत राहण्यासाठी दीर्घायुष्य लाभो.